**इंडिया कोड पोर्टलवर अधिनियम/नियम अपलोड करण्यासाठी १० संगणक व स्कॅनरप्रिंटरसह खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२५/प्र.क्र.६४/भाषा-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०५ जून,२०२५

वाचा :- भाषा संचालनालयाचे पत्र क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.१४/६६६/सोळा, दि. ०२/०६/२०२५.

**प्रस्तावना :-**

मा. सर्वोच्च न्यायालयाच्या व मा. उच्च न्यायालयाच्या निर्देशांनुसार महाराष्ट्र राज्य अधिनियम व केंद्रीय अधिनियम यांचे अद्ययावतीकरण करुन सदर अधिनियम, नियम इ. इंडिया कोड पोर्टल वर अपलोड करण्यासाठी १० आयटी ऑफिस असिस्टंट ही पदे २४ महिन्यांच्या कालावधीसाठी बाह्ययंत्रणेमार्फत घेण्यास मान्यतेसाठीचा प्रस्ताव उपसमितीसमोर सादर करण्यात आला असता, त्यास उपसमितीची मान्यता प्राप्त झाली असून, सदर कामाकरिता १० संगणक व स्कॅनरप्रिंटरची आवश्यकता आहे. त्याकरिता १० संगणक व स्कॅनरप्रिंटरसह खरेदी करण्यासाठी येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

भाषा संचालनालयाने सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने मा. सर्वोच्च न्यायालय व मा. उच्च न्यायालयाच्या निर्देशांनुसार इंडिया कोड पोर्टल या प्रणालीवर राज्य व केंद्रीय अधिनियम (मराठी) अपलोड करण्यासाठी नवीन १० संगणक व स्कॅनरप्रिंटरसह खरेदी करण्याकरीता रू. १०,००,०००/- (रुपये दहा लाख फक्त) खर्चास सदर आदेशान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासंबंधी होणारा खर्च भाषा संचालनालयाच्या मागणी क्रमांक झेडएफ ०१, मुख्य लेखाशिर्ष २०५२ सचिवालय-सर्वसाधारण सेवा, ०९०, (००) (०२) भाषा संचालक (अनविार्य) (२०५२ ५०६३), १७ संगणक" या उद्दिष्टातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ (भाग पहिला), उप विभाग-दोन, अनुक्रमांक २७-अ, नियम ७६ नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६०५१२२७५४१६३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by SHILPA RAJENDRA DESHMUKH
Date: 2025.06.05 12:28:31 +05'30'

**(शिल्पा देशमुख)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

२. अपर मुख्य सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर
४. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),मुंबई, नागपूर,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७. प्रधान सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सह सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. संचालक, भाषा संचालनालय, वांद्रे(पूर्व), मुंबई.
११. सर्व कार्यासन अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (भाषा-१)